**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः असप्र १२१७/प्र.क्र.१००/चौदा**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ११.०८.२०१७

**आदेश**

श्री.मिलिंद कुलकर्णी, अवर सचिव, नगर विकास विभाग यांची महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास कोकण मंडळ या कार्यालयातील सह-मुख्य कार्यकारी अधिकारी या पदावर प्रथमत: एक वर्षाकरीता प्रतिनियुक्तीने नियुक्ती खालील अटींच्या व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहेत.

(अ) श्री.मिलिंद कुलकर्णी, अवर सचिव ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला श्री.मिलिंद कुलकर्णी, अवर सचिव आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन, प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती गृहनिर्माण विभाग व नगर विकास विभाग यांनी आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

३. श्री.मिलिंद कुलकर्णी, अवर सचिव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी गृहनिर्माण विभाग यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०८१११५२७०२१३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.08.11 15:18:05 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव
३. अपर मुख्य सचिव (सेवा),सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई,
४. अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव, नगर विकास विभाग/गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,
५. मुख्याधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास कोकण मंडळ, रूम नं.१६८, पोटमाळा, गृहनिर्माण भवन, कलानगर, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
६. सह/उप सचिव - नगर विकास विभाग/गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. श्री.मिलिंद कुलकर्णी, अवर सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती कार्यासन-१४